संगणक संकेतांक क्र.20101222182811001

**विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रगतीच्या आढावा घेऊन मार्गदर्शन करण्याकरीता समिती**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.एसईझेड-२००३/(५७७/०३)/उद्योग-२,

उद्योग, उर्जा व कामगार विभाग,

शिबीर कार्यालय, नागपूर

दिनांक :- १२ डिसेंबर, २००३

**वाचा :-**

शासन निर्णय उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्रमांक.- एसईझेड-२००१/(१५२)/उद्योग-२, दिनांक १२ ऑक्टोबर २००१.

**प्रस्तावना :-**

विशेष आर्थिक क्षेत्रासंबंधातील शासनाचे धोरण दि.१२ ऑक्टोबर, २००१ च्या शासन निर्णयाव्दारे जाहीर करण्यात आले. मुंबई येथील सीप्झ या क्षेत्रास यापुर्वीच विशेष आर्थिक क्षेत्राचा दर्जा दिलेला आहे. त्याशिवाय सिडको मार्फत नवी मुंबई येथे द्रोणागिरी व खाजगीरित्या उरण, जिल्हा रायगड येथे विकसीत करण्यात येणा-या विशेष आर्थिक क्षेत्रास केंद्र शासनाने तत्वत: मान्यता दिलेली आहे. त्याशिवाय महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत नागपूर येथे विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्याचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर केलेला आहे. त्याशिवाय राज्यात इतरही भागात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्याबाबत प्रस्ताव तयार करण्यासंबंधी कार्यवाही चालू आहे.

राज्यात औद्योगिक विकासाला अधिक गती यावी व गुंतवणूक आकर्षित होऊन निर्यात वाढावी. त्याचप्रमाणे रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात याकरीता विशेष आर्थिक क्षेत्राचा विकास त्वरेने व्हावा असे राज्याचे धोरण आहे. त्याकरीता स्थापन होणाऱ्या विशेष आर्थिक क्षेत्राचा प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेऊन अडचणी दूर करण्याबाबत समिती नेमण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यात स्थापन होणा-या विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रगतीचा आढावा घेणे कार्यान्वीत असलेल्या विशेष आर्थिक क्षेत्राच्या अडचणी दूर करणे या संबंधात मार्गदर्शन करुन निर्णय घेण्याकरीता मा.मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे शासन समिती स्थापन करीत आहे :-

| | |
|---|---|
| १) मंत्री (उद्योग) | अध्यक्ष |
| २) राज्यमंत्री (उद्योग) | सदस्य |

३) प्रधान सचिव (वित्त) सदस्य
४) प्रधान सचिव (नगर विकास-१) सदस्य
५) प्रधान सचिव (उद्योग) सदस्य
६) सचिव (उर्जा) सदस्य
७) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ सदस्य
८) व्यवस्थापकीय संचालक, सिडको सदस्य
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ सदस्य
१०) सर्व विकास आयुक्त,विशेष आर्थिक क्षेत्रे सदस्य
११) सर्व विकासक, विशेष आर्थिक क्षेत्रे सदस्य
१२) विकास आयुक्त, उद्योग सदस्य सचिव

संबंधीत विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रमूख अधिकारी किंवा आयुक्त यांनी, विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रगती संबंधाचा तसेच उद्‌भवणाऱ्या अडचणी याबाबतचा अहवाल मा.प्रधान सचिव (उद्योग) यांना दर महिन्याच्या १० तारखेपर्यन्त सादर करावा.

प्रगतीचा आढावा घेऊन, विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासाचे काम त्वरीत व्हावे यादृष्टीने मार्गदर्शन करावे. विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करताना येणाऱ्या अडचणी अगर स्थापन झालेल्या विशेष आर्थिक क्षेत्रासंबंधात उद्‌भवणाऱ्या अडचणी दूर करण्याच्या दृष्टीने मार्गदर्शन करुन समिती आवश्यक निर्णय घेईल.

विशेष आर्थिक क्षेत्राची प्रगती त्वरीत करण्यासाठी अगर विशेष आर्थिक क्षेत्राच्या अडचणी दूर करण्याकरीता संबंधीत अधिकाऱ्यांना समितीच्या बैठकीस आमंत्रीत करण्यात येईल. समितीची बैठक महिन्यातून एकदा घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

( स.या. ठाकरे )
शासनाचे अवर सचिव

प्रत :-

प्रधान सचिव (वित्त)
प्रधान सचिव, नगर विकास (१)
सचिव (ऊर्जा)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विकास महामंडळ, मुंबई
व्यवस्थापकी संचालक, सिडको, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
विकास आयुक्त (उद्योग)

सर्व विकास आयुक्त, विशेष आर्थिक क्षेत्रे,
सर्व विकासक, विशेष आर्थिक क्षेत्रे
मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
निवड नस्ती